राष्ट्रीय मानवी हक्क आयोगाच्या शिफारशी-
नुसार राज्यातील कारागृहामध्ये पंखे बसविण्यास
प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय, क्रमांक-एमएजे-०१९६/४/प्र.क्र. ४७/पोआरएस-२.
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२. दिनांक:- १० मार्च १९९९.

वाचा:- कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. एनएचआरसी/फॅन्स/१९९५/क-५/[४] दिनांक २१. ६. ९६.

शासन निर्णय:- राष्ट्रीय मानवी हक्क आयोगाच्या सदस्यांनी येरवडा मध्यवर्ती कारागृहास भेट दिली असता त्यावेळी कारागृहातील बराकीमध्ये पंखे बसविण्याची आवश्यकता आहे, अशी शिफारस केली. राज्यांच्या कारागृहामध्ये अधिकृत क्षमतेपेक्षा जास्त बंदी अपु-या जागेमुळे ठेवावे लागतात. त्यामुळे प्रदुषणाचा प्रश्न निर्माण होऊन वायुविजन होत नाही. ही बाब विचारात घेऊन व मानवी हक्क आयोगाने केलेली शिफारस विचारात घेऊन राज्यातील कारागृहामध्ये पंखे बसविण्याबाबतचा प्रस्ताव कारागृह महानिरीक्षक यांनी शासनास मान्यतेसाठी सादर केला आहे.

२. कारागृह महानिरीक्षक, यांनी शासनास प्रस्तावित केले आहे की, राज्यातील कारागृहामध्ये एकूण २५०४ -इतके छताचे पंखे बसविण्यास व त्यासाठी येणारा खर्च रु. ४९, ८०, १८३/- यास प्रशासकीय मान्यता द्यावी अशी शासनास विनंती केली आहे. कारागृह महानिरीक्षक यांनी सादर केलेल्या प्रस्तावास मान्यता देण्याची बाब कांही काळ शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासन या आदेशाद्वारे राज्यातील सर्व कारागृहामध्ये एकूण २५०४ छताचे पंखे बसविण्यास व त्यासाठी येणारा खर्च रु. ४९, ८०, १८३/- [एकोणपन्नास लक्ष ऐंशी हजार एकशे त्र्याऐंशी रुपये फक्त] इतकी रक्कम आर्थिक वर्ष १९९९-२००० मध्ये उपलब्ध होणा-या अनुदानातून भागविण्यास प्रशासकीय मान्यता देण्यांत येत आहे.

३. राज्यातील कारागृहामध्ये छताचे पंखे बसविण्यासाठी आर्थिक तरतूद झाल्याशिवाय प्रत्यक्ष कामास सुरुवात करण्यांत येऊ नये. यासाठी मान्य केलेल्या नियत व्ययांतूनच खर्च भागविण्यांत यावा. त्यासाठी अतिरिक्त अनुदान मंजूर करण्यांत येणार नाही.

४. यासाठी होणारा खर्च मुख्य लेखाशिर्ष "४०५९-सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च-०१ कार्यालयीन इमारती-१०१, बांधकाम पंचवार्षिक योजनांतर्गत योजना" [तुरुंग] या लेखाशीर्षाखाली सन १९९९-२००० या आर्थिक वर्षात उपलब्ध होणा-या तरतुदीतून भागविण्यांत यावा.

५. हा शासन निर्णय नियोजन विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र. १६८/का. १४५५ दिनांक २४. ११. ९८ व वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र. सीआर-७४४/९८/ व्यय-८, दिनांक ६. २. ९८ च्या संमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

[ गु. ज. कुलकर्णी ]
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे.

कारागृह उपमहानिरीक्षक [मु.] महाराष्ट्र राज्य, पुणे.

सर्व कारागृह उपमहानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य.

सर्व कारागृह अधिक्षक.

महालेखापाल, महाराष्ट्र-१ [लेखा व अनुज्ञेयता] मुंबई.

महालेखापाल, महाराष्ट्र-१ [लेखा परिक्षा] मुंबई.

महालेखापाल, महाराष्ट्र-२ [लेखा व अनुज्ञेयता] नागपूर.

महालेखापाल, महाराष्ट्र-२ [लेखा परिक्षा] नागपूर.

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

निवासी लेखा अधिकारी, मुंबई.

सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.

सार्वजनिक बांधकाम विभाग/इमा-२, मंत्रालय, मुंबई.

नियोजन विभाग/१४५५, मंत्रालय, मुंबई.

वित्त विभाग/व्यय-८, मंत्रालय, मुंबई.

गृह विभाग, कार्यासन बीपुडी-१, मंत्रालय, मुंबई.

निवडनस्ती.